सामाजिक न्याय विभागाच्या शासकीय
वसतिगृहांस समाजसुधारकांची नावे देण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग**
**शासन निर्णय.क्र.बीसीएच २०१७/प्र.क्र.१७४/शिक्षण-२**
हुतात्मा राजगुरू चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय, विस्तार भवन, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक - २८ जून,२०१७

**प्रस्तावना :-**

सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभागाच्या शासकीय वसतिगृहांस अदयापपर्यंत मागासवर्गीय मुलांचे वसतिगृह, गुणवंत मुलांचे वसतिगृह असे संबोधण्यात येत होते. तसेच या विभागामार्फत अनुसूचित जाती व नवबौध्द घटकांच्या विद्यार्थ्यांसाठी ज्या निवासी शाळा सुरू केल्या आहेत, त्यांनाही कोणतेही नाव देण्यात आलेले नाही. त्यामुळे एका शहरात अनेक वसतिगृहे असतात व ती ओळखणे कठीण जात असल्याचे निदर्शनास आले आहे. त्यासाठी प्रत्येक वसतिगृहास त्या जिल्हयातील थोर समाजसुधारकांचे, स्वातंत्र्य सेनानी अथवा अन्य थोर व्यक्तींची नावे दिल्यास त्या व्यक्तींची आदर्श कार्ये वसतिगृहातील विद्यार्थ्यांपर्यंत पोहोचविणे शक्य होईल, या करिता जिल्हयातील प्रत्येक शासकीय वसतीगृहास व शासकीय निवासीशाळेस त्याच जिल्ह्यातील थोर समाजसुधारक, स्वातंत्र्य सेनानी इत्यादींची नावे देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन आहे. त्याकरिता खालीलप्रमाणे समिती गठीत करण्याचा निर्णय घेण्यात आला आहे.

**शासन निर्णय :-**

सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभागाच्या शासकीय वसतीगृहांस व शासकीय निवासी शाळांना समाज सुधारकांची नावे निश्चित करण्याकरीता खालीलप्रमाणे समिती गठीत करण्यात येत आहे.

| अ.क्र. | सदस्याचे नाव | पद |
|---|---|---|
| १. | मा.मंत्री,सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग,मंत्रालय मुंबई | अध्यक्ष |
| २. | मा.राज्यमंत्री,सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग,मंत्रालय मुंबई | उपाध्यक्ष |
| ३. | सचिव,सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग,मंत्रालय मुंबई | सदस्य |
| ४. | सहसचिव (शिक्षण-२) | सदस्य सचिव |

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेत स्थळावर उपलब्ध असून त्याचा संगणक सांकेतांक क्रमांक २०१७०६२७१६२५४९००२२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Vishakha Sachin Adhav

Digitally signed by Vishakha Sachin Adhav
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Social Justice And Special Assistance Dept, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=1d4700e952a830d47e7b2f63ad9254269391a93afec7d28ddf93bcbec52721ac, cn=Vishakha Sachin Adhav
Date: 2017.06.28 11:36:12 +05'30'

**(वि.स.आढाव)**
कार्यासन अधिकारी,महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१. मा. राज्यपाल यांचे सचिव, महाराष्ट्र राज्य
२. मा.मुख्यमंत्री, महाराष्ट्र राज्य यांचे अपर मुख्य सचिव
३. मा. मंत्री ( सामाजिक न्याय) यांचे खाजगी सचिव

४. मा. राज्यमंत्री (सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग) यांचे खाजगी सचिव
५. सचिव,सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग,यांचे वरिष्ठ स्वीय सहायक
६. आयुक्त, समाज कल्याण, महाराष्ट्र राज्य, पुणे
७. सह सचिव (शिक्षण-२)
८. अवर सचिव (शिक्षण-२)
९. निवड नस्ती,का -शिक्षण २